**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, कळवण यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, दळवण, कनाशी, खिराड, विसापूर, मोहनदरी, चणकापूर, बापखेडा येथील दुरुस्तीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : शाआदु-२०१०/प्र.क्र.१०४/का.१३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ११ मार्च,२०१०.

**शासन निर्णय :** प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, कळवण यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, दळवण, कनाशी, खिराड, विसापूर, मोहनदरी, चणकापूर, बापखेडा या आश्रमशाळांच्या दुरुस्तीच्या एकूण रु.४२,४९,६३७/- इतक्या रकमेच्या ७ अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव विचाराधीन आहे.

२. सदर सुधारित अंदाजपत्रके संबंधित शाखा अभियंता यांनी तयार केली असून उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग क्र.३, कळवण यांनी तपासली आहेत. तसेच प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, कळवण, उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग क्र.३, कळवण व कार्यकारी अभियंता, आदिवासी सार्वजनिक बांधकाम विभाग, कळवण यांनी साक्षांकित केली आहेत.

३. सदर अंदाजपत्रके सन २००९-१० च्या दरसूचीवर आधारित आहेत. सदर कामे दुरुस्तीची असून प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, कळवण यांचे कार्यक्षेत्रातील उपरोक्त शाळेच्या दुरुस्तीच्या अंदाजपत्रकांना खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | शासकीय आश्रमशाळेचे नांव | बाब | अंदाजपत्रकीय किंमत |
|---|---|---|---|
| १ | शासकीय आश्रमशाळा, दळवट, ता.कळवण, जि.नाशिक. | दुरुस्ती | रु.४,१९,०००/- |
| २ | शासकीय आश्रमशाळा, कनाशी, ता.कळवण, जि.नाशिक. | दुरुस्ती | रु.८,४६,३६८/- |
| ३ | शासकीय आश्रमशाळा, खिराड, ता.कळवण, जि.नाशिक. | दुरुस्ती | रु.६,१८,३१९/- |
| ४ | शासकीय आश्रमशाळा, विसापूर, ता.कळवण, जि.नाशिक. | विशेष दुरुस्ती | रु.४,९८,४५०/- |
| ५ | शासकीय आश्रमशाळा, मोहनदरी, ता.कळवण, जि.नाशिक. | दुरुस्ती | रु.५,४४,९००/- |
| ६ | शासकीय आश्रमशाळा, चणकापूर, ता.कळवण, जि.नाशिक. | दुरुस्ती | रु.५,३९,१००/- |
| ७ | शासकीय आश्रमशाळा, बापखेडा, ता.कळवण, जि.नाशिक. | दुरुस्ती | रु.७,८३,५००/- |
| | **एकूण** | | **रु.४२,४९,६३७/-** |

४. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी सु मोटो रिट याचिका क्र.१४२०/२००८ प्रकरणी वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार शासकीय आश्रमशाळांमध्ये चांगल्या सोयीसुविधा पुरविणे आवश्यक आहे. सदर काम सुरु होण्यापूर्वी व काम पूर्ण झाल्यावर त्याचे व्हीडीओ शुटींग करुन त्याची सी.डी. शासनास सादर करण्यात यावी.

५. सदर दुरुस्तीचा खर्च सन २००९-१० या वर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

६. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अ.क्र.१ व सा.बां.विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद १३४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०१००३११९४१५२२००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( गी. मो. चांदे )
अवर सचिव

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, कळवण.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
कार्यकारी अभियंता, आदिवासी सार्वजनिक बांधकाम विभाग, कळवण.
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग क्र.३, कळवण.
कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.